**महाराष्ट्र राज्य सहकारी परिषदेची पुर्नरचना, परिषदेवर अध्यक्षांची नेमणूक.**

# महाराष्ट्र शासन
## सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग
## शासन निर्णय क्रमांकः मरास-२०१५/प्र.क्र. ७/२२-स

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: २१ फेब्रुवारी, २०१५

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम, १९६० चे कलम १५४ (क) मधील तरतुदीनुसार प्राप्त झालेल्या अधिकाराचा वापर करुन या आदेशाद्वारे महाराष्ट्र राज्य सहकार परिषदेची नव्याने पुर्नरचना करण्यात येत आहे. या परिषदेचा कार्यकाल दिनांक २०.०२.२०१५ पासून तीन वर्षे अथवा पुढील आदेश होईपर्यंत यापैकी जो कालावधी कमी असेल तोपर्यंत राहील.

महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम, १९६० च्या कलम १५४ (क) मधील तरतूदीनुसार प्राप्त झालेल्या अधिकाराचा वापर करुन या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र सहकारी परिषदेवर (महाराष्ट्र स्टेट को-ऑप. कौन्सिल) श्री. शेखर चरेगावकर यांची अध्यक्ष म्हणून नेमणूक करण्यात येत आहे.

महाराष्ट्र राज्य सहकार परिषदेची कार्ये महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम, १९६० च्या कलम १५४ (क) (३) मधील तरतूदीनुसार पुढीलप्रमाणे राहतील :-

१) सहकारी चळवळीशी संबंधित अशा सर्व बाबींवर राज्य शासनाला सल्ला देणे.
२) सहकारी चळवळीचा आढावा घेणे व राज्यातील सहकारी संस्थांच्या कार्याचा समन्वय साधण्याचे मार्ग सुचविणे.
३) सहकारी संस्थांना येणा-या अडचणी दूर करण्यासाठी मार्ग व उपाय सुचविणे.
४) राज्य शासन, परिषदेकडे निर्देशित करील अशा सर्व बाबींवर राज्य शासनाला अहवाल देणे.
५) राज्यातील सहकारी चळवळीच्या विकासाबाबतच्या योजना व धोरणे यांची शिफारस करणे.
६) विशेषत: समाजातील मागासवर्गीय व आर्थिकदृष्ट्या दुर्बल वर्ग यांच्या विकासासाठी असलेल्या सहकारी चळवळीचा विकास करण्यासाठी असलेल्या विद्यमान परियोजनांचे मुल्यांकन करणे व नवीन परियोजना सुचविणे.
७) सहकारी पध्दतीद्वारे आर्थिक विकास करण्याच्या विशेष परियोजनेची अंमलबजावणी करण्यासाठी राज्य शासनाला सल्ला देणे.
८) विभागामार्फत किंवा खास स्थापन केलेल्या मंडळामार्फत उपरोक्त कोणत्याही प्रयोजनासाठी अभ्यास करण्याचे काम हाती घेणे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२२११६२१५३९३०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kavita Kishor Parkar

Digitally signed by Kavita Kishor Parkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Kavita Kishor Parkar
Date: 2015.02.21 16:30:27 +05'30'

**( क. कि. पारकर )**

सह सचिव, महाराष्ट्र शासन,

**प्रत,**

१) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
२) मा. मंत्री (सहकार), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाम, मंत्रालय, मुंबई.
३) मा. राज्यमंत्री (सहकार), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाम, मंत्रालय, मुंबई.
४) श्री. शेखर चरेगावकर, अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य सहकारी परिषद,
५) प्रधान सचिव (सहकार) , सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाम, मंत्रालय, मुंबई.
६) प्रधान सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८) साखर आयुक्त, साखर आयुक्तालय, शिवाजीनगर, पुणे.